श्री.

# संगीतशिक्षक.

लिहिणार,

शिवराम सदाशिव मनोहर.

माजी प्रिन्सिपॉल—मौलाबक्ष गायनवादनशाळा, मुंबई, आणि स्वरप्रस्तार व संगीत मृच्छकटिक वगैरे नाटकांतील पदांचें नोटेशनचे कर्ते.

मुंबई.

" इंदुप्रकाश स्टीम प्रेस " मध्यें छापिलें.

आवृत्ति १ ली.

प्रती १०००.

सन १९०५.

किंमत २ रुपये.



# अर्पणपत्रिका.

परम गुणज्ञ संगीताचार्य गुरुवर्य

मरहूम प्रोफेसर

## मौलाबक्ष घीसेखां



ज्यांनीं गायनवादनविद्येचा प्रसार करण्याकरितां अविश्रांत श्रम केले व जे सदा दयाळु, परोपकारी व सत्यप्रिय असत त्यांच्या या जगांत कीर्तीरूपी अमर आत्म्यास गायनवादनविद्येचा प्रसार करण्याकरितांच तयार केलेलें हें **"संगीत शिक्षक"** अर्पण असो.

त्यांचा नम्र विद्यार्थी

**शिवराम सदाशिव मनोहर.**

# प्रस्तावना.

सृष्टींतील सर्व विद्या व कलामध्यें **गायनवादनविद्या** ही अत्यंत मोहक आहे. हिच्या साधनानें मनुष्य निर्दय माणसाचें हृदयांत दया उत्पन्न करूं शकतो आणि हिंस्र जनावरें ताब्यांत घेऊं शकतो. सारांश, ह्या जगांत असा एकही प्राणी सांपडणार नाहीं कीं, ज्यास गायनवादन विद्येनें मोहित केलें नाहीं. ह्या मर्त्य जगांतील प्राणीच काय परंतु रावणानें आपल्या गायन कलेनें शंकरासही प्रसन्न करून घेतले होते असें आपल्या वेद्य पुराणांतरीं आपण ऐकतों. मनाची एकाग्रता करण्यास गायनवादनविद्या हें एक मोठें साधन आहे; आणि ह्या कारणानेंच महान् भक्त देवालयांत ईशप्रार्थनेचे वेळीं गायनवादनाचा उपयोग करीत असतात. ह्या साधनानें धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चारी मिळण्याचा संभव आहे असें आपल्या ऋषींनीं जें लिहून ठेविलें आहे तें कांहीं खोटें नाहीं.

प्राचीन काळीं आपल्या ह्या आर्यावर्तांत गायनवादनविद्या अतिशय उत्कर्षाप्रत पावली होती. त्या काळांत उच्च वर्गांतील स्त्रिया देखील संगीतशास्त्राचा अभ्यास करीत असत व त्या वेळीं या कलेस फार मान असे. परंतु हल्लीं आमच्या दुर्दैवानें दुसऱ्या विद्या व कलांप्रमाणें ही विद्याही नाहींशी होत होत अगदीं नामशेष होऊं पाहत आहे. अनेक कारणांपैकीं याचें मुख्य कारण आमची संस्कृत भाषा मृतभाषा होणें हें होय. मुसलमान लोकांचे स्वाऱ्यांपासून आमचीं संस्कृत ग्रंथांचीं भांडारें लुप्तप्राय जाहल्यामुळें सर्व विद्या व कलांचा लोप जाहला; परंतु कोणतीहि स्थिति येवो व कसलाही प्रसंग येवो, मोहक वस्तु थोड्या बहुत प्रमाणावर कोणासही आवडणारच. मुसलमानांच्या स्वाऱ्यानंतर ही मोहक विद्या राज्यक्रांतीमुळें हिंदूंतून यवन लोकांत गेली अर्थात् ती धन्याप्रमाणें स्वेच्छाचारी व लहरी बनली. ईशचिंतन सोडून तिनें लोकाचें चित्तरंजन करण्याचाच मार्ग धरिला आणि यामुळें या विद्येवरच पोट भरणाऱ्या परंतु अमंगल लोकांचा तिजला स्पर्श जाहल्यामुळें साहजिकच ही विद्या कमी दर्जाची असा लोकाचा गैरसमज होऊन इजकडे त्यांचें दुर्लक्ष झालें.

असो. आनंदाची गोष्ट ही कीं आजकाल विद्वान् लोक या मोहक विद्येचा केवळ मनोरंजनच नव्हे तर कला व विद्या या नात्यानें स्वीकार करीत आहेत. विद्वान लोकांचे आश्रयावांचून आणि विशेषतः विद्याप्रिय असलेल्या सत्ताधीशांच्या आश्रयावांचून कोणत्याही विद्येचें पुनरुज्जीवन होत नसतें. विद्याविलासी **श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड** यांनीं इतर कलांप्रमाणें ही विद्याही हातीं धरिली आणि तिचें पुनरुज्जीवन करण्याचें मनांत आणिलें. एखादी चांगली गोष्ट करण्याचा मनुष्याचा पक्का निश्चय झाला ह्मणजे दयाळू परमेश्वर त्यास त्याची इच्छा पुरी करण्याचीं साधनें देत असतो. या नियमाप्रमाणें माझे परम पूज्य गुरु मरहुम प्रोफेसर **मौलाबक्ष घिसेखां** यांची—ज्यांची संगीत कलेचा प्रसार करण्याची उत्कट इच्छा होती व ज्यांनीं त्या बाजूनें प्रयत्नही चालविले होते—व श्रीमंतांची योगानुसार गांठ पडली व पुढें महाराजांनीं त्यांचे सल्ल्यानें आपलें राज्यांत या विद्येच्या शाळा स्थापन केल्या. त्यामुळें सुशिक्षित लोकांसही हिचा फायदा घेतां आला. माझ्या सुदैवानें मी बडोदें संस्थानांत असल्यामुळें मजला

थोड्या बहुत अंशानें ही विद्या प्राप्त जाहली. आतां हिंदुस्थानांत बरेच ठिकाणीं या विद्येस विद्वान् लोकांचा व राजे लोकांचा आश्रय मिळून या विद्येच्या शाळा स्थापन झाल्या आहेत. अलीकडे आमच्या दयाळू सरकारांनीं या विद्येची महती ओळखून कांहीं सरकारी शाळांतून ही विद्या सुरू केली आहे. वरील कारणांनीं मला अशी बळकट आशा आहे कीं या विद्येचें पूर्व स्वरूप लोकांचे नजरेस लवकरच येईल.

स्वतःस ही विद्या जी कांहीं थोडी बहुत प्राप्त जाहली आहे तिचा लाभ आपण हरप्रयत्नें आणि सत्य तेवढा लोकांस करून द्यावा या इच्छेनें बडोदें संस्थानांतून कांहीं कारणपरत्वें येथें आल्यानंतर " श्री बॉम्बे मौलाबक्ष म्युझिक स्कूल " नांवाची संस्था येथील प्रसिद्ध नागरिक सर भालचंद्र कृष्ण भाटवडेकर एल्. एम्. नाईट व इंदुप्रकाश आणि सयाजीविजय यांचे चालक मि. दामोदर सावळाराम यंदे यांचे अनुमतीनें आणि सहाय्यानें सन १९०२ सालीं स्थापन केली. नंतर सुमारें एक वर्षानें संगीतज्ञ लोकांकरितां आणि विशेषतः संस्थेंतील विद्यार्थ्यांकरितां स्वरप्रस्तार या नांवाचें पुस्तक प्रसिद्ध केलें. त्या वेळीं या विद्येचे भोक्तेमंडळीकडून गायनवादनविषयावर एखादें चांगलें पुस्तक प्रसिद्ध करण्याविषयीं बऱ्याच सूचना आल्यावरून व माझेंही मनांत असलें एखादें पुस्तक तयार करून गायनवादनविद्येची थोडीशी सेवा करावी असें असल्या कारणानें मीं हें पुस्तक माझ्या फावल्या वेळांत लिहिण्यास आरंभ केला. सयाजी विजयचे या वर्षीचे डायरींत जाहिरात दिल्याप्रमाणें चालू वर्षाचे आरंभींच हें पुस्तक तयार व्हावयाचें परंतु तें यंदाचे प्लेगमुळें व कांहीं दुसऱ्या अपरिहार्य अडचणीमुळें लांबणीवर पडलें. असो; आनंदाची गोष्ट ही कीं प्रभूचे कृपेनें आज तें विद्वान लोकांपुढें येत आहे.

या पुस्तकांत एकंदर सहा प्रकरणें आहेत.

( १ ) गायनवादनविद्येची माहिती. ( २ ) निरनिराळ्या रागांतील तराणे, अष्टपद्या, ध्रुपद वगैरे २५ चिजा. ( ३ ) तबल्याचें सचित्र वर्णन, प्रचलित सर्व तालांचे ठेके व ते वाजविण्याचे नियम. ( ४ ) सतारीची सचित्र माहिती व वीस सुरस गती. ( ५ ) हार्मोनियमची सचित्र माहिती व कांहीं सरगमा आणि ( ६ ) गायनवादनविद्येविषयीं नानाविध विचार व गायनवादनविद्येतील कांहीं पारिभाषिक शब्दांचा कोश असें अनुक्रमें वरील सहा प्रकरणांत दिलें आहे. या पुस्तकांत दिलेले विषय अगदीं प्राथमिक असून त्यांचें विवेचन मनोरंजक व सर्वांस समजण्यासारखें करण्याचा प्रयत्न केला आहे.

वर सांगितल्याप्रमाणें ही विद्या जेव्हां मुसलमानलोकांत गेली तेव्हां ते लोक ह्या विद्येचा अंगीकार विद्या ह्या नात्यानें न करितां एक मोहक चीज ह्या नात्यानें करूं लागल्यामुळें त्या वेळच्या लहरी, स्वच्छंदी व या विद्येवरच केवळ पोट भरणारे लोकांकडून मुखपरंपरा होऊन ती आज आपणास प्राप्त जाहली आहे आणि या कारणानें यांत असणाऱ्या विषयांतील कांहीं गोष्टींसंबंधानें बराच मतभेद असण्याचा संभव आहे, तरी त्यांत कांहीं तथ्य नाहीं असें म्हणण्याचा मात्र माझा आग्रह नाहीं. मला ह्या विद्येचें जें कांहीं शिक्षण मिळालें व तत्संबंधीं मी जी माहिती मिळविली त्यांतील ज्या गोष्टींचा एकमेकांशीं मेळ दिसून तर्कशास्त्रदृष्ट्या सयुक्तिक वाटल्या तेवढ्याच गोष्टी या पुस्तकांत ग्रथित केल्या आहेत. ज्या ठिकाणीं

वाचकांस मतभेद आढळेल त्या संबंधांत त्यानीं आपलें मत व या विद्येसंबंधीं अधिक माहिती मजला कळविल्यास मी त्यांचा आभारी होऊन ईशकृपेनें या पुस्तकाची दुसरी आवृत्ती निघ- ण्याचा प्रसंग आल्यास त्यांना योग्य मान दिला जाईल.

असा एक सर्वसाधारण प्रश्न येतो कीं, "कां हो यापासून गायनवादनविद्या स्वतःच शिकतां येईल काय ?" यास उत्तर एवढेंच कीं, कोणतीही विद्या किंवा कला गुरुमुखाशिवाय समाधानकारक येणें शक्य नाहीं. परंतु एखाद्या विद्येचें अथवा कलेचें ज्यांत निरूपण केलें आहे अशा पुस्तकाचे सहाय्यानें ती विद्या लवकर शिकतां येते. ह्या न्यायानें या पुस्तकाचे योगानें गायनवादनविद्या थोड्याशाच गुरुमुखानें जिज्ञासू व अभ्यासी शिष्यास बरीच लवकर शिकतां येईल असें माझें नम्र मत आहे. येथें एक विशेष सांगवयाचें तें हेंच कीं, या पुस्तकांत दिल्यापैकीं कोणतेंही वाद्य शिकण्यास आरंभ करण्यापूर्वी प्रकरण १ भाग ११ यामधील समजून दिलेल्या चिन्हांची उत्तम प्रकारची ओळख करून घ्यावी म्हणजे कोणत्याही वाद्यांत लवकर प्रगति होऊं शकेल.

तरफदार सतारींतील असणाऱ्या पडद्याखालील तारा निरनिराळ्या थाटांतील राग वाजवितांना मिळविण्यासंबंधी माहिती; गायनवादनविद्येसंबंधी विशेष गहन विचार; श्रुतीसंबंधीं अधिक विचार; जे राग, त्यांत लागणाऱ्या स्वरांचे मानानें अगदीं सारखे दिसतात त्यांचीं नांवें निरनिराळीं पडण्यास कारणीभूत असणारे त्यांतील सूक्ष्म भेद; उपलब्ध असणाऱ्या सर्व चिजांचें नोटेशन आणि प्राचीनकाळीं वापरण्यांत येणारे सुमारें शंभर ताल व त्यांची समजूत वगैरे बऱ्याच गोष्टींसंबंधीं एखादें निराळें पुस्तक लिहिण्याची इच्छा आहे. परंतु ह्या विषयांच्या गहनपणाचे मानानें पाहिलें ह्मणजे ही गोष्ट बरीच अवधीची आहे. प्रभुइच्छा असेल तर तीही पार पडेल.

हें पुस्तक लिहितांना माझे मित्र रा. प्रभाकर कृष्ण मराठे यांनीं बऱ्याच उपयुक्त सूचना व मदत केली याबद्दल त्यांचा मी अत्यंत आभारी आहे. तसेंच रा. पुरुषोत्तम सखाराम उर्फ पिलोबा पंडीत यांनीं आपला वेळ खर्च करून या पुस्तकाची एक सुवाच्य प्रत छापण्यास देण्यालायक तयार केली ह्याबद्दल त्यांचेही अभार मानितो.

आपल्या ह्या नामशेष होऊं पाहणाऱ्या गायनवादनविद्येचा प्रसार सुशिक्षितलोकांमध्यें होऊन ही पूर्वस्थितींत यावी हा या पुस्तकाचा मूळ उद्देश आहे, तो उद्देश प्रभुकृपेनें थोड्या थोड्या प्रमाणानें कां होईना पार पडला असतां या पुस्तकाबद्दल झालेल्या माझ्या श्रमांचे सार्थक झालें असें मी समजेन. दयाळू परमेश्वराच्या कृपेनें ही विद्या तसेंच आपल्या सर्व आर्यविद्या व कला पूर्वस्थितिप्रत पावोत.

मुंबई—
तारीख १ दिसेंबर १९०५. } **शिवराम सदाशिव मनोहर.**

———

# अनुक्रमणिका.

| भाग. | प्रकरण १ लें. | पृष्ठ. |
|---|---|---|



## प्रकरण २ रें.



## प्रकरण ३ रें.

## प्रकरण ४ थें.



## प्रकरण ५ वें.



## प्रकरण ६ वें.

॥ श्रीगणेशाय नमः ॥

# संगीत शिक्षक.

# THE MUSIC TEACHER

## प्रकरण पहिलें.

### भाग १ ला.

### संगीत.

॥ गीतं वाद्यं नर्तनं च त्रयं संगीतमुच्यते ॥

( सं. रत्नाकर ).

संगीत.

गीत. वाद्य. नर्तन.

गाणें, वाजविणें व नृत्य करणें या तीन गोष्टीस संगीत ही संज्ञा आहे. अशी एक कल्पना करूं या कीं एखादा गाणारा एखादें गाणें म्हणत आहे. त्यांत आपणांस साधारणपणें काय काय दिसतें ? ( १ ) तो गाणारा कांहीं उच्चनीच स्वर आळवीत असतो. ( २ ) त्याच्याबरोबर एखादा मनुष्य कोणत्याही एखाद्या वाद्यामध्यें तें गाणें जसेंच्या तसें उमटविण्याचा प्रयत्न करीत असतो अथवा तबलजी त्या गाण्याचा जो ताल असेल त्याचे अनुरोधानें तबला वाजवीत असतो आणि ( ३ ) गाणारा स्वतः आपल्या गाण्यांतील अक्षरांमध्यें काय अर्थ किंवा भाव आहे हें आपल्या हातांनीं, कांहीं विशेष अंगविक्षेपांनीं किंवा तोंडावरील भिन्न भिन्न चर्यांचे योगानें दाखवीत असतो. आतां वरील गाणारा जे उच्चनीच स्वर आळवीत असतो त्यास **गाणें**; तंतुवाद्य, हारमोनियम अथवा कोणत्याही एखाद्या

वाद्यांत गाणाऱ्याचे उच्चनीच स्वर जसेच्या तसेच काढण्याचा प्रयत्न चालला असतो तें, अथवा तबल्यावर त्या गाण्याच्या तालाच्या अनुरोधानें जें कांहीं वाजविलें जातें त्यास **वाजविणें;** आणि गाणारा स्वतः आपल्या गाण्यांतील शब्दांचा भाव आपल्या हातांनीं, अंगविक्षेपांनीं किंवा तोंडावरील भिन्न भिन्न चर्यांनीं प्रगट करीत असतो त्यास **नाचणें** अशा **संगीत** शब्दांतील **गीत, वाद्य** आणि **नर्तन** ह्यांच्या व्याख्या आहेत आणि म्हणूनच या तिहींच्या समावेशास " **संगीत** " ही संज्ञा आहे.

---

## भाग २ रा.

## संगीताचे भेद.

संगीताचे दोन भेद आहेत. जसे १ संगीत विद्या आणि २ संगीत कला.

( १ ) **संगीत विद्या**—कोणत्याही रागाची व कोणत्याही तालाची त्या रागाचे व त्या तालाचे नियमांस अनुसरून एखादी मनःकल्पित चीज किंवा एखादी " सरिगम " बनविणें ह्यास संगीत विद्या असें म्हणतात.

( २ ) **संगीत कला**—वरील व्याख्येमध्यें दिलेल्या नियमांनुरूप रचलेली चीज अगर " सरगम " जशीच्या तशीच म्हणतां येणें, एखाद्या वाद्यांत वाजवितां येणें किंवा कोणी एखादी चीज म्हटली अगर वाजविली असतां त्यास असणारे स्वर व ताल, **मींड** वगैरे अस्पष्ट स्वर खेरीज करून लिहितां येणें ह्यांस संगीत कला असें म्हणतात.

आतां माझ्यामतें संगीत विद्या व संगीत कला या दोहेंपैकीं संगीत कला ही विशेष अवघड आहे. कारण एखादा मनुष्य एखाद्या रागाचें व तालाचें लक्षणास अनुसरून एखादी चीज अथवा " सरगम " थोड्याशा श्रमानें बांधूं शकेल परंतु त्याबरहुकूम ती चीज अथवा " सरगम " ह्मणतां येणें हें कठीण आहे; कारण त्यास गाण्याचे मुख्य आधारस्तंभ असणाऱ्या सात स्वरांची त्यांचे पोटभेदांसह चांगलीच ओळख असली पाहिजे. आधुनिक गाणारांमध्यें पूर्ण स्वरज्ञान असणारे फारच थोडे सांपडतील आणि स्वरज्ञानाचे अभावामुळेंच गायनवादनविद्या फार कठीण होऊन बसली आहे. संगीत कला ज्यास चांगली अवगत आहे तो गायनवादनविद्या थोड्या श्रमांत पुष्कळ चांगली शिकूं व शिकवूं शकेल. **( कांहीं लोक पुष्कळ दिवसांच्या अभ्यासानें वाद्यांत गाणें जसेंच्या तसेंच वाजवितात परंतु आपण कोणते स्वर वाजविलेत ते वाद्य खालीं ठेऊन सांगा असें त्यांनां जर विचारिलें तर त्यांस सांगतां येत नाहींत आणि ह्मणून त्यांस संगीतकला जाणणारे असें ह्मणतां येणार नाहीं. )**

---

## भाग ३ रा.

### नाद ह्मणजे काय? (स्वर).

आत्माविवक्षमाणोयं मनः प्रेरयते मनः ॥
देहस्थं वन्हिमाहन्ति स प्रेरयति मारुतम् ॥ १ ॥
ब्रह्मग्रंन्थिस्थितः सोऽथ क्रमादूर्ध्वपथे चरन् ॥
नाभिहृत्कंठमूर्धास्यैष्वानिर्भावयति ध्वनिम् ॥ २ ॥

(सं. रत्नाकर.)

ह्मणजे बोलण्याची इच्छा धरणारा आत्मा मनास प्रेरणा करितो, मन ( अन्तःकरण ) शरीरांत असणाऱ्या जठराग्नीस प्रेरणा करितें आणि जठराग्नि ब्रह्मग्रन्थींत ( नाभीचे खालीं चार बोटावर असणारी ) असणाऱ्या वायूस प्रेरणा करितो ह्मणजे त्या वायूस गति मिळून तो नाभी, हृदय, कंठ, मस्तक आणि मुखांतून अनुक्रमें बाहेर पडून शब्द उत्पन्न करितो; शब्द ह्मणजे नाद; नाद या शब्दांतः—

नकारं प्राणनामानं दकारमनलं विदुः ॥
जातः प्राणाग्निसंयोगात्तेन नादोभिधीयते ॥

**न**—कारास प्राण ह्मणजे वायू आणि **द**—कारास अग्नि अशा संज्ञा आहेत आणि ह्मणूनच प्राण ह्मणजे वायू आणि अग्नि या दोहोंचे संयोगानें नाद किंवा आवाज उत्पन्न होतो. आवाज दोन प्रकारचे आहेत. १ ध्वन्यात्मक व २ वर्णात्मक. ( १ ) सतार, ताऊस वगैरे वाद्यांतून ऐकूं येणाऱ्या आवाजांस ध्वन्यात्मक आणि शाब्दिक आवाजास वर्णात्मक आवाज असें ह्मणतात. गाण्यांत येणारे आवाज किंवा नाद ध्वन्यात्मक असतात आणि नाद ह्मणजे स्वर.

गाण्याचा सर्व आधार स्वरांवर आहे. आतां हे स्वर किती आहेत व त्यांचे पोटभेद कसे कसे होतात हें पुढील भागांत दिलें आहे.

---

## भाग ४ था.

### स्वाभाविक सात स्वरांचीं नांवें व त्यांचें एकमेकांपासून अंतर.

गाण्यांत एकंदर सात स्वर मुख्य आहेत. त्यांचीं नांवें:—१ षड्ज, २ ऋषभ, ३ गांधार, ४ मध्यम ५ पंचम, ६ धैवत, आणि ७ निषाद.

गाण्यामध्यें षड्जादि सात स्वरांचीं पूर्ण नांवें एका मात्रेंत ह्मणतां येणें अशक्य असल्यामुळें आपल्या प्राचीन संगीतवेत्त्यांनीं त्यांच्या एकाक्षरी संज्ञा केल्या आहेत; त्या १ **सा**, २ **री**, ३ **ग**, ४ **म**, ५ **प**, ६ **ध**, ७ **नी** अशा अनुक्रमें होत.

**स्वरांचें अंतर**—वरील सात स्वरांत स्वभावतः जें अंतर राहिलें आहे तें दोन प्रकारचें आहे. ( १ ) पूर्णांतर आणि ( २ ) अर्धांतर. ( यांस इंग्रजींत Tone and Semitone अशा संज्ञा आहेत. )

सात स्वरांपैकीं पांच स्वरांमध्यें पूर्णांतर आहे. जसें:—( सा–री ), ( रि–ग ), ( म–प ), ( प–ध ), आणि ( ध–नी ); आणि दोन स्वरांमध्यें अर्धांतर आहे जसें:—( ग–म ) आणि ( नी–सां ).

आतां स्वरांतील पूर्णांतर आणि अर्धांतर म्हणजे काय याची कल्पना वाचकांस देण्याकरितां पुढील भागांत श्रुतिसंबंधीं थोडीशी माहिती देऊन आठवे भागांत स्वरांचे भेद व स्थाई–अस्थाई स्वर वगैरेची माहिती दिली आहे.

## भाग ५ वा.

### श्रुतिविषयीं; २२ श्रुति व त्यांचीं नांवें.

**श्रूयंते इति श्रुतयः**—जें कांहीं ऐकिलें जातें त्यांस श्रुति असें म्हणतात. ही श्रुतीची अमर्यादित व्याख्या होय. विश्वावसू लिहितातः—श्रवणेन्द्रिय ग्राह्यत्वाद् ध्वनिरेव श्रुतिर्भवेत् ॥ म्हणजे श्रवणेन्द्रियांस ऐकूं येणारा ध्वनि श्रुति होय. परंतु गाण्यामध्यें ज्या सूक्ष्म ध्वनीचा उपयोग करण्यांत येतो त्यासच " श्रुति " असा श्रुति शब्दाचा मर्यादित अर्थ करितात. अशा रीतीनें संगीत रत्नाकराचे कर्ते शार्ङ्गदेव एकंदर २२ श्रुति सिद्ध करितात. त्या खालीं दिल्याप्रमाणें:—षडज ४, ऋषभ ३, गांधार २, मध्यम ४, पंचम ४, धैवत ३ आणि निषाद २.

२२ श्रुतींचीं नांवें:—

| | | | |
|---|---|---|---|
| १ तीव्रा | ८ रौद्री | १४ क्षिति | १८ मदंति |
| २ कुमुद्वती | ९ क्रोधा–ग | १५ रक्ता | १९ रोहिणी |
| ३ मंदा | १० वज्रिका | १६ संदीपिनी | २० रम्या–ध |
| ४ छंदोवती–सा | ११ प्रसरिणी | १७ आलापिनी–प | २१ उग्रा |
| ५ दयावती | १२ प्रीति | | २२ क्षोभिणी–नी. |
| ६ रंजनी | १३ मार्जनी–म | | |
| ७ रतिका–री | | | |

## भाग ६ वा.

### सप्तस्वरांविषयीं पाश्चिमात्य विचार.

अनेक साधनांवरून युरोपीयन शास्त्रवेत्यांनीं सात स्वरांचीं आंदोलनें (Vibrations) नक्की ठरविण्याचा प्रयत्न केला आहे. शेवट साधारण असें अनुमान निघालें आहे कीं, ज्यास आपण किंवा ते षड्ज असें म्हणतात, तो स्वर उत्पन्न होण्यास हवेची एका सेकंडांत २६४ आंदोलनें व्हावीं लागतात. स्वभावतः षड्जापासून निषादपर्यंत जे शुद्ध स्वर ठेविले गेले आहेत त्यांचें प्रमाणः—१ : ९/८ : ५/४ : ४/३ : ३/२ : ५/३ : १५/८ असें आहे. म्हणजे सात स्वरांचीं आंदोलनें खालीं दिल्याप्रमाणें असतात.

| षड्ज | ऋषभ | गांधार | मध्यम | पंचम | धैवत | निषाद. |
|---|---|---|---|---|---|---|
| २६४, | २९७, | ३३०, | ३५२, | ३९६, | ४४०, | ४९५. |

शुद्ध स्वरास २४/२५ नें गुणिलें असतां तें त्या स्वरापेक्षां कोमल आवाजाचे १ सेकंडांत होणाऱ्या हवेतील आंदोलनाचें प्रमाण दाखवील आणि शुद्ध स्वरास २४/२५ नें भागिलें असतां तें त्या स्वरापेक्षां तीव्र आवाजाचे १ सेकंडांत हवेंत होणाऱ्या आंदोलनाचें प्रमाण दाखवील. (Ganot's Physics; Theory of sound).

आतां एवढें मात्र लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, लहानमोठ्या वयाचे माणसाचे कंठांतून सहजरीत्या निघणारा षड्ज हवेच्या एका सेकंडांत २६४ आंदोलनांचा नसतो. तो कमी-जास्त प्रमाणांत असतो. लहान वयाचे माणासाचा षड्ज २६४ पेक्षां जास्त आंदोलनांचा असतो. व मोठे वयाचा २६४ पेक्षां कमी आंदोलनांचा असतो. परंतु प्रथम कल्पना केलेला स्वर (षड्ज) कोणतेही आंदोलनाचा असला तरी त्याचे पुढील शुद्ध स्वराचे प्रमाण वर दिल्याप्रमाणें ह्मणजे १ : ९/८ : ५/४ : ४/३ : ३/२ : ५/३ : १५/८ असेंच असतें. स्त्रीजातीचे कंठांतून निघणारा षड्ज २६४ पेक्षां बऱ्याच अधिक आंदोलनांचा असतो.

## भाग ७ वा.

### सप्तस्वर व त्यांचे पोटभेद.

गाण्यांत एकंदर सात स्वर आहेत त्यांचीं नांवें षड्ज, ऋषभ, गांधार, मध्यम, पंचम, धैवत, आणि निषाद अशीं आहेत. अनादिकाळापासून स्वभावतःच षड्जापासून निषादापर्यंत जशा शुद्ध जागा ठेविल्या गेल्या आहेत त्यांचें प्रमाण वरील भागांत दिल्याप्रमाणें

म्हणजे

| सा | री | ग | म | प | ध | नी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ : | ९/८ | ५/४ | ४/३ | ३/२ | ५/३ | १५/८ |

असें असतें. याप्रमाणांनीं निघणारे स्वरास शुद्ध स्वर ही संज्ञा आहे. आतां वरील स्वरांचे प्रमाणांत खालीं दिल्याप्रमाणें अंतर आहे.

| प्रमाण | स्वर | अंतर | कोणत्या स्वरांमध्यें. |
|---|---|---|---|
| १ | सा | | |
| ९/८ | री | ९/८ | (सा—री) |
| ५/४ | ग | १०/९ | (री—ग) |
| ४/३ | म | १६/१५ | (ग—म) |
| ३/२ | प | ९/८ | (म—प) |
| ५/३ | ध | १०/९ | (प—ध) |
| १५/८ | नी | ९/८ | (ध—नी) |
| २ | सा | १६/१५ | (नी—सा) |

स्वरांतर काढणें ह्मणजे एका विशिष्ट नियमांप्रमाणें भागाकाराचे रीतीनें काढावें, वजाबाकीचे रीतीनें काढण्याचें नाहीं.

आतां ज्या स्वरामध्यें ९/८ व १०/९ असें अंतर आहे त्यास पूर्णांतर ( Tone ) व ज्यांत १६/१५ हें अंतर आहे त्यास अर्धांतर ( Semitone ) असें ह्मणतात.

## भाग ८ वा.

---

### विकृत स्वर ( कोमल तीव्र स्वर ) आणि स्थायी व अस्थायी स्वर.

कोणत्याही शुद्ध स्वरापासून तो स्वर अर्धांतर ( Semitone ) चढविला किंवा उतरविला असतां होणारा स्वर त्या शुद्ध स्वराचा विकृत स्वर होय. सप्त स्वरांपैकीं **षडज** आणि **पंचम** ह्यांचे विकृत स्वर होत नाहींत. ह्मणजे ते नेहमीं शुद्धच असावयाचे. बाकी राहिलेल्या पांच स्वरांचे ह्मणजे ऋषभ, गांधार, मध्यम, धैवत व निषाद यांचे विकृत स्वर होतात, ह्मणजे त्यांचे कोमल व तीव्र असे भेद होऊं शकतात. शुद्ध स्वरास एका अर्धांतरानें उतरविलें असतां होणाऱ्या स्वरास त्या स्वराचा कोमल स्वर ह्मणतात आणि त्यास अर्धांतरानें चढविलें असतां होणाऱ्या स्वरास त्या स्वराचा तीव्र स्वर ह्मणतात.

ऋषभ, गांधार, मध्यम, धैवत व निषाद ह्या पांच स्वरांपैकीं ऋषभ, गांधार, धैवत व निषाद हे कोमल होऊं शकतात ह्मणजे अर्धांतर उतरूं शकतात, आणि मध्यम मात्र तीव्र होऊं शकतो ह्मणजे अर्धांतर चढूं शकतो. कोमल होऊं शकत नाहीं ह्मणजे अर्धांतर उतरूं शकत नाहीं. कारण स्वभावतःच अनादिकालापासून शुद्ध स्वरांच्या मांडणीचे जें प्रमाण आहे, त्यामध्यें गांधारपासून मध्यमची योजना अर्धांतरावरच आहे ह्मणजे

गांधारापासून मध्यम अर्धांतरानेंच जास्त आहे. मध्यमपासून त्यास आपण अर्धांतरानें कमी करून उच्चार केला तर त्यापासून शुद्ध गांधाराचाच आवाज निघेल. ह्मणून मध्यम कोमल होऊं शकत नाहीं. तसेंच ऋषभ, गांधार, धैवत व निषाद हे स्वर तीव्र होऊं शकत नाहींत; कारण ऋषभ ह्यास अर्धांतरानें वाढवून म्हटलें तर त्यापासून कोमल गांधार, गांधारचा शुद्ध मध्यम, धैवतचा कोमल निषाद आणि निषादचा षडज् असे आवाज अनुक्रमें होतील. त्यावरून लक्षांत ठेवण्याचें कीं, सप्तस्वरांपैकीं षडज् व पंचम नेहमीं शुद्ध; ऋषभ, गांधार, धैवत व निषाद ह्या स्वरांचें कोमल आणि शुद्ध व मध्यम स्वराचे शुद्ध व तीव्र असे भाग होऊं शकतात:—

( १ ) आतां ज्या स्वरांचे कांहीं फेरफार होत नाहींत ह्मणजे ज्या स्वरांचे विकृत स्वर होत नाहींत त्यास स्थायी स्वर असें ह्मणतात. जसें षडज् आणि पंचम. ज्या स्वरांचें कोमल किंवा तीव्र असे फेरफार होतात ह्मणजे ज्या स्वरांचें विकृत स्वर होतात त्यास अस्थायी स्वर असें ह्मणतात. जसें:—ऋषभ, गांधार, मध्यम, धैवत आणि निषाद.

( २ ) सात स्वर व त्यांचे पोटभेद मिळून १२ स्वरांचें कोष्टक.

| स्थायी | अस्थायी | | अस्थायी | | अस्थायी | | स्थायी | अस्थायी | | अस्थायी | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| सा | री | | ग | | म | | प | ध | | नी | |
| शुद्ध | कोमल | शुद्ध | कोमल | शुद्ध | शुद्ध | तीव्र | शुद्ध. | कोमल. | शुद्ध | कोमल. | शुद्ध |

जुने गवई किंवा त्यांचे अनुयायी स्वरांचे फक्त कोमल व तीव्र असेच भाग करितात; ह्मणजे कल्याण रागांत सर्व स्वर तीव्र व भैरवींत सर्व स्वर कोमल लागतात अशी त्यांची ह्मणण्याची पद्धत आहे. परंतु ह्यांत कितपत तथ्य आहे हें ह्या भागांत दिलेल्या निरूपणांवरून वाचकांचे सहज लक्षांत येईल. आणि शुद्ध (Natural) स्वरांची कल्पना केल्याशिवाय त्या स्वरांचे कोमल (Flat) व तीव्र (Sharp) स्वरांची कल्पना करणें अशक्य आहे. मध्यम तीव्र ह्मटला ह्मणजे शुद्ध मध्यमची कल्पना आणि गांधार कोमल ह्मटला ह्मणजे शुद्ध गांधारची कल्पना प्रथम केल्याशिवाय भागत नाहीं.

---

## भाग १ वा.

### सप्तकें.

आरोही व अवरोही.

षड्‌जापासून निषादापर्यंत ( ह्मणजे सा, री, ग, म, प, ध, नी ) सात स्वरांचे समुदायास सप्तक असें ह्मणतात.




*सप्तकें तीन प्रकारचीं आहेत. १ मंद्र, २ मध्य, आणि ३ तार.

**मध्य सप्तकः**—अति उंच नाहींत व अति नीच नाहींत असे जे सप्तस्वर ( आरोही व अवरोही ) आपण सहजरीत्या आपल्या आवाजास विशेष श्रम न पडतां ह्मणतो त्यास मध्यसप्तक असें ह्मणतात. जसें:—सा, री, ग, म, प, ध, नी.

---

* **टीप**—गाण्यांत साधारण तीनच सप्तकें गृहीत धरण्यास कारणें:—

अशी कल्पना करूं या कीं एखादा १० फूट लांबीचा जर पियानो बनविला तर त्यांत १० सप्तकें करितां येतील परंतु गाण्यांत तीन सप्तकें कायम करण्याचें कारण एवढेंच कीं साधारणपणें कोणताही मनुष्य गाऊं लागला तर त्याचे आवाजाचा धर्म, तो ज्या सुरापासून ह्मणजे जो सूर मूळ घेऊन गाण्यास सुरवात करितो त्या सुराचे मंद्र, मध्य आणि तार सप्तक एवढ्या मध्यें असतो.

**मंद्र सप्तकः**—मध्य सप्तकाचे खालील जे सात स्वर त्यांस मंद्रसप्तक असें ह्मणतात.

जसें:—नी, ध, प, म, ग, री, सा,—ह्यास खरजाचें सप्तक असेंही ह्मणतात.

**तार सप्तकः**—मध्य सप्तकाचे वरील जे सात स्वर त्यास तार सप्तक असें ह्मणतात.

जसें:—सा, री, ग, म, प, ध, नी. ह्यास टीपेचें सप्तक असेंही ह्मणतात.

षड्जापासून त्याचे वरच्या षड्जापर्यंत स्वर चढवीत नेणें ह्यास आरोह व त्या षड्जापासून खालील षड्जापर्यंत स्वर उतरविणें ह्यास अवरोह असें ह्मणतात.

( यापुढें षड्जादि सात स्वरांबद्दल त्यांचीं संक्षिप्त नांवें ह्मणजे सा, री, ग, म, प, ध, नी अशीं वापरलीं आहेत. )

---

## भाग १० वा.

### गायनवादन लेखनपद्धति.

### ( NOTATION SYSTEM ).

**गायनवादन लेखनपद्धतिः**—कोणतीही एखादी चीज, पद, गत अथवा कोणतेंही गाणें ह्यास त्याची होणारी "सरगम" व त्यास असणारा **ताल** ह्यांस कोणत्याही एका विशिष्ट लेखनपद्धतीचे नियमांस अनुसरून लिहिणें त्यास **गायनवादन लेखनपद्धति** असें ह्मणतात. ह्याच पद्धतीस इंग्लिश भाषेमध्यें Notation System असें ह्मणतात. आपल्या लोकांत अशा रीतीनें गाणें लिहिण्याच्या पद्धती प्राचीन संस्कृत ग्रंथांतून आढळतात, परंतु त्या प्रचारांत नसल्यामुळें दुर्बोध आहेत. अलीकडेही ब-याच संगीतज्ञ लोकांनीं कांहीं गायनवादन लेखनपद्धती तयार केल्या आहेत. त्याप्रमाणें मरहूम प्रोफेसर **मौलाबक्ष** यांनींही एक पद्धत तयार केली आहे. ती पद्धत फारच सोपी आणि विचाराची अशी आढळून आल्यामुळें त्याच पद्धतीचें विवेचन या भागांत केलें आहे. अशा लेखनपद्धतीनें **गायनवादन** फारच सोपें झालें आहे व मनुष्यास आपले सर्व व्यवसाय संभाळून ह्या पद्धतीच्या सहाय्यानें गानवादन विद्या थोड्या काळांत संपादन करितां येते.

आतां पुष्कळ जुने रीतीचे गवय्यांचें एकपक्षीं ह्मणणें असें असतें कीं "क्या कुच गाना लिखा जाय गा ?" परंतु त्यांनीं थोडासा विचार जर केला व दुसरे काय ह्मणतात हें जर शांतपणानें ऐकण्याच्या इच्छेनें ऐकून घेतलें तर त्यांना असें खास आढळून येईल कीं **गायनवादन** हें लिहितां येतें व त्यापासून लोकांस बराच फायदाही होऊं शकतो. स्वरज्ञान व अशी एखादी गायनवादन लिहिण्याची पद्धति, यांच्या अभावामुळें गायनवादन-

विद्या जशी शिकवावी तशी जुन्या गवयांस शिकवितां येत नाहीं; यामुळें ही विद्या एवढी कठीण होऊन बसली आहे व विशेषत: सद्गृहस्थांस जुन्या चालींच्या गवयांच्या असभ्य, गैरशिस्त व अनियमित वर्तनामुळें तर ही विद्या दुरापास्त आहे असें वाटतें.

आतां गायनवादन लेखनपद्धतीनें गाणें लिहिणें कितपत शक्य आहे ह्याची कल्पना वाचकांस देऊन या पद्धतीचें निरूपण करितों.

गाण्यांतील किंवा वाजविण्यांतील जे स्वर कानांस स्पष्टपणें ऐकूं येतील म्हणजे ज्या सुरावर थांबतां येईल तेवढेंच लिहिणें शक्य आहे. मींडचें काम ( म्हणजे ज्या गाण्यांत किंवा वाजविण्यांत एका स्वरापासून दुसऱ्या एखाद्या स्वरापर्यंत तुटक रीतिनें न जातां मधील स्वरांचे श्रुतीच्या अंगांनीं सरपटत जाणें ) मात्र समाधानकारक लिहितां येत नाहीं. ह्याचें कारण एका स्वरापासून दुसऱ्या स्वरापर्यंत सरपटत जाण्यांत मधील स्वरांचे येणाऱ्या श्रुतींवर केव्हां व किती अवकाशपर्यंत जाणें होतें हें कळत नाहीं. बहुजनसमाजास सहज रीतीनें कळेल असें एक उदाहरण आपण घेऊं.

आपण आपली बोलण्याची भाषा सर्व लिहूं शकतो म्हणजे जें कांहीं कानांस स्पष्ट ऐकूं येऊं शकतें, तें सर्व त्या भाषेच्या लिपीच्या अनुषंगानें लिहूं शकतों. परंतु मनुष्य ढेंकर देतो, शिंकतो, घोरतो, रडतो, हंसतो, खोकतो, खाकरतो वगैरे व पशुपक्ष्यांचे आवाज आपल्या कानांस कळतात व त्यांत कांहीं वर्ण असावेत असा आपणांस तर्कही होतो. परंतु त्यांतील एकाही वर्णाचा स्पष्ट उच्चार कळत नसल्यामुळें आपण तें लिहूं शकत नाहीं. तसेंच वरील दिलेल्या मींड वगैरे गाण्याचे अंगासंबंधानें समजावें. थोडक्यांत सांगणें म्हणजे जें काम बाजाचे पेटींत होऊं शकतें, तें सर्व लिहितां येतें ( कारण बाजाचे पेटींत अस्पष्ट काम निघेल अशी शंकाच नाहीं. ) तंतुवाद्यामध्यें एका पडद्यावरील तार मागें पुढें करणें किंवा एका पडद्यावरील स्वरास गज मारून पुढील अथवा मागील वाटेल ते पडदे तुटक न वाजवितां तसेंच बोट मागें पुढें फिरवून वाजविणें म्हणजे अस्पष्ट ध्वनि काढणें होय आणि म्हणूनच तें लिहिणें अशक्य होय.

आतां मींड वगैरे कांहीं गोष्टी वरील दर्शविलेल्या कारणांमुळें जरी लिहितां न आल्या तरी त्याशिवाय बहुतेक गाणें लिहितां येणें शक्य आहे.

येथें असें सांगून ठेविलें पाहिजे कीं इंग्लिश लोकांत गाण्याची जी कांहीं थोडीशी कला आहे ती त्यांनीं या पद्धतीमुळेंच इतकी वाढविली आहे. सारांश, जर एखादें काम कांहीं नियमित पद्धतीनें केलें तर तें थोड्या श्रमांत बरेंच समाधान कारक होत असतें असा सर्वांचा अनुभव आहे.

# भाग ११ वा.

## गायनवादन लेखनपद्धतीचें निरूपण.

गायनवादन लेखनपद्धति पूर्णपणें अवगत होण्यास दोन गोष्टी अति महत्वाच्या आहेत.

१ गाण्यांत किंवा वाजविण्यांत निघणारा स्वर कोणत्या सप्तकांतील, कोमल, शुद्ध किंवा तीव्र, व किती अवकाश पर्यंत लावला गेला आणि,

२ त्या गाण्यास असणाऱ्या तालाचें स्वरूप समजणें म्हणजे त्या तालास किती मात्रा आहेत व त्या कसकशा भागांनीं पुऱ्या होतात व कोणत्या मात्रेवर ताल किंवा खाली तालाचे ठोके पडतात हें समजणें; ( हें सर्व कांहीं नियमित चिन्हांनीं दर्शविलें जातें. )

पैकीं वरील ( १ ) मध्यें येणाऱ्या चिन्हांस स्वरचिन्हें आणि ( २ ) मध्यें येणाऱ्या चिन्हांस ताल चिन्हें असें म्हणतात.

### स्वरचिन्हें.

री:—हा शुद्ध ऋषभ होय. ज्या स्वरापुढें कांहीं चिन्ह नसतें तो शुद्ध स्वर समजावा.

रीv:—हा कोमल ऋषभ होय. ज्या स्वरापुढें v असें चिन्ह असतें तो कोमल स्वर समजावा. आणि,

म/—हा तीव्र मध्यम होय. म्हणजे मध्यमा पुढें उजवे बाजूस त्या " मध्यम " चा फाटा म/ असा वर फोडलेला असतो तेव्हां मध्यम तीव्र समजावा.

उदाहरणार्थ:—( १ ) सा री ग म प ध नी सां

( २ ) सा रीv ग म प धv नी सां

( ३ ) सा री गv म प ध नीv सां

( ४ ) सा रीv गv म प धv नीv सां

( ५ ) सा रीv गv म/ प धv नी सां

( ६ ) सा री ग म/ प ध नी सां

( ७ ) सा रीv ग म/ प धv नी सां

( ८ ) सा रीv ग म/ प ध नी सां

( ९ ) सा री गv म प धv नीv सां

ह्यांत आपणास काय दिसून येतें?—

( १ ) सर्व स्वर शुद्ध आहेत.

( २ ) री आणि ध कोमल आहेत.

( ३ ) ग आणि नी कोमल आहेत.

( ४ ) री, ग, ध आणि नी कोमल आहेत.

( ५ ) री, ग, ध कोमल आणि म तीव्र आहेत.

( ६ ) म तीव्र आहे.

( ७ ) री, ध, कोमल आणि म तीव्र आहेत.

( ८ ) री कोमल आणि म तीव्र आहेत.

( ९ ) ग, ध आणि नी कोमल आहेत.

## सप्तक चिन्हें.

१ ज्या स्वरास त्याचे वर किंवा डावे बाजूस कांहींएक चिन्ह नसतें तो स्वर मध्य सप्तकांतील आहे असें समजावें; जसें म.

२ ज्या स्वरावर ( म̄ ) अशी आडवी रेघ असते तो स्वर तार किंवा टीप सप्तकांतील आहे असें समजावें आणि,

३ ज्या स्वराचे खालीं डावे बाजूकडे त्याचा पाय फोडलेला असतो ( म्र ) तो स्वर मंद्र अथवा खरज सप्तकांतील आहे असें समजावें.

उदाहरणार्थः—

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| सा | ग | री | म | ग | प | म | ध | प | नी | ध | सा | नी | री | सा |
| १६ | १७ | १८ | १९ | २० | २१ | २२ | २३ | २४ | २५ | २६ | २७ | २८ | २९ | ३० |
| ग | री | नी | सा | ध | नी | प | ध | म | प | ग | म | री | ग | सा |
| ३१ | ३२ | ३३ | ३४ | ३५ | ३६ | | | | | | | | | |
| री | न्री | सा | ध्र | न्री | प्र | | | | | | | | | |

वरील नंबर १२, १४, १५, १६, १७आणि १९तार किंवा टीप सप्तकांतील आहेत. नंबर ३२, ३४, ३५ व ३६ मंद्र किंवा खरज सप्तकांतील आहेत आणि बाकी राहिलेले कीं ज्यांस त्यांचे खालीं डावे बाजूस किंवा वर कांहीं चिन्हें नाहींत ते सर्व मध्य सप्तकांतील स्वर होत.

## स्वर–काल चिन्हें.

स्वर किती वेळ लांबविणें त्यांबद्दल त्या स्वराखालीं कालदर्शक चिन्हें असतात तीं खालीं दिल्याप्रमाणेंः—

| सचिन्ह स्वर. | चिन्हांचीं नांवें. | किती मात्रा* लांबविणें. | रिमार्क. |
|---|---|---|---|
| सा ^ | प्लुत | ८ | * ( मात्राः—साधारणपणें मनुष्याच्या नाडीचे ठोक्याचे अंतरास मात्रा असें ह्मणतात. ) |
| सा ४० | दीड द्विगुरू. | ६ | |
| सा ४ | द्विगुरू. | ४ | |
| सा ऽ० | दीड गुरू | ३ | |
| सा ऽ | गुरू | २ | |
| सा० | दीड लघु | १॥ | |
| सा | लघु | १ | ज्या स्वरास कांहीं चिन्ह नसेंत तो लघुस्वर समजावा. |
| सा॒ | द्रुत | -॥- | |
| सा॒ | अनाद्रुत | -।- | |

उदाहरणार्थः-

ग़ऽ म ध़ ध़ म़ प़ ग़॥ म़॥ प़ धऽ० नी४ सां४०

$= २ + १ + \frac{१}{२} + \frac{१}{२} + \frac{१}{२} + \frac{१}{२} + \frac{१}{४} + \frac{१}{४} + \frac{१}{२} + ३ + ४ + ६ = १९$

२ अनाद्रुत = १ द्रुत.

२ द्रुत = १ लघु.

२ लघु = १ गुरु.

२ गुरु = १ द्विगुरु,

२ द्विगुरु = १ प्लुत.

## ताल चिन्हें.

प्रकरण २ मध्यें दिलेल्या चिजांचे आरंभीं कांहीं आंकडे व त्याचे खालीं असणाऱ्या रेषेखालीं कांहीं विवक्षित चिन्हें दिलीं आहेत; त्यांचे योगानें पुढें लिहिलेल्या चिजेस असणाऱ्या तालाच्या मात्रा किती आहेत व त्या कसकशा भागांनीं पुऱ्या होतात हें कळतें.

त्यांस तालाचें स्वरूप व त्यांत असणाऱ्या चिन्हांस ताल चिन्हें असें म्हणतात. तीं खालीं दिल्या प्रमाणें:—

| चिन्हें | नांवें. | मात्रा. |
|---|---|---|
| ◡ | अनुद्रुत किंवा विराम | १ |
| ० | द्रुत | २ |
| ◡० | द्रुत विराम | ३ |
| ǀ | लघु | ४ |
| ◡ǀ | लघु विराम | ५ |
| ०ǀ | लघु द्रुत | ६ |
| ◡०ǀ | लघु द्रुत विराम | ७ |
| ऽ | गुरु | ८ |
| ◡ऽ | गुरु विराम | ९ |
| ०ऽ | गुरु द्रुत | १० |
| ◡०ऽ | गुरु द्रुत विराम | ११ |
| ǀऽ | गुरु लघु | १२ |
| ◡ǀऽ | गुरु लघु विराम | १३ |
| ०ǀऽ | गुरु लघु द्रुत | १४ |
| ◡०ǀऽ | गुरु लघु द्रुत विराम | १५ |
| 8 | द्वि गुरु | १६ |
| ⅄ | प्लुत | ३२ |

१ सूचनाः—साधारणपणें असा नियम आहे कीं स्वर चिन्हांच्या मात्रांपेक्षां ताळ चिन्हांच्या मात्रा चौपटीनें असतात.

२ ताल चिन्हें लिहितानां सर्वांत अधिक मात्रांचें चिन्ह प्रथम लिहून त्यावर त्याहून कमी मात्रांचें चिन्ह, व त्यावर त्यापेक्षां कमी मात्रांचें चिन्ह अशा रीतीनें लिहावें.

☞ **उदाहरणार्थः**—ताल तेताला घ्या. त्यास १६ मात्रा असतात. त्यास तीन ताळ ( शब्द क्रिया ) व एक खाली ताल ( निःशब्द क्रिया ) असे चार भाग असतात. प्रत्येक भाग चार मात्रांचा असतो. वर दिलेल्या चिन्हांचे अनुरोधानें तेताल्याचें स्वरूप खालीं दिल्या प्रमाणें होईल. जसें:—

१६ IIII = १६ ४४४४

१, २, ३, ४; ५, ६, ७, ८; ९, १०, ११, १२; १३, १४, १५, १६.

या प्रमाणें १८ व्या भागामध्यें प्रचारांत असणाऱ्या तालांचीं स्वरूपें व त्यांची समजूत दिली आहे.

## इतर चिन्हें.

स्वर चिन्हें व तालचिन्हांविरहित गाण्यांत किंवा वाजविण्यांत ज्या ज्या इतर क्रिया करणें अवश्य आहेत त्या समजण्यास जीं इतर चिन्हें कायम करण्यांत आलीं आहेत तीं खालीं लिहिल्या प्रमाणें:—

| स्वरांमध्यें जी एक उभी रेघ काढलेली असते तीस बार अथवा तालस्तंभ असें म्हणतात.

प्रारंभीं असें चिन्ह जेथें दिलेलें असतें त्या पुढील लिहिलें जाणारें गायन मरहूम प्रोफेसर मौलाबक्ष यांनीं स्वतः केलेल्या गायनवादन लेखनपद्धतीस अनुसरून लिहिलें आहे असें समजावें.

— ताल, ठोका मारणें ( शब्दक्रिया )

ᐨ समताल, ह्मणजे शब्दक्रियेपैकीं मुख्य ताळ ह्मणजे अवसान.

⁷ खाली ताल किंवा काल ( निशब्दक्रिया ).

ह्या चिन्हांच्या डावे बाजूचीं अक्षरें ( स्वर ) दोन वेळ ह्मणणें किंवा वाजविणें.

ह्या चिन्हांच्या डावे व उजवे बाजूचीं अक्षरें ( स्वर ) दोन वेळ ह्मणणें किंवा वाजविणें.

हें चिन्ह गाण्याचें किंवा वाजविण्याचें पूर्णत्वदर्शक आहे.

*——* ह्या चिन्हांमधील येणारीं अक्षरें (स्वर) दोन वेळ ह्मणणें अगर वाजविणें.

## आराम चिन्हें.

ㄱ लघु आरामचिन्ह. हें चिन्ह असेल तेथें ताल सुरू असून एक मात्रेचा अवकाश सोडून पुढील स्वर ह्मणणें.

ऽ गुरु आरामचिन्ह. हें चिन्ह असेल तेथें ताल सुरू असून दोन मात्रेचा अवकाश सोडून पुढील स्वर ह्मणणें.

ऽ० त्रिलघु आरामचिन्ह:—हें चिन्ह असेल तेथें ताल सुरू असून तीन मात्रेचा अवकाश सोडून पुढील स्वर ह्मणणें.

---

## भाग १२ वा.

### यतिविषयीं. ( तान दर्शक चिन्हें )

यति शद्ब यम्धातूपासून झाला आहे. यम् ह्मणजे ताब्यांत ठेवणें. जेव्हां गाण्यांतील एका अक्षरास दोन किंवा अधिक स्वर असतात तेव्हां त्या स्वरावर कौंसाकृति रेघ दिलेली असते. त्या रेघेस तानदर्शक चिन्ह अथवा यति ह्मणतात. यतीचे मुख्य प्रकार आढळतात ते:—१ समयति, २ विषमयति, ३ गोपुच्छयति, ४ प्लुतयति आणि ५ मृदंगयति.

१ **समयति**:—एका अक्षरास दोन स्वर असले ह्मणजे त्या यतीस समयति **असें** ह्मणतात. जसें:—

म ग प<br>ऽ<br>मा नू

२ **विषमयति**:—एका अक्षरास दोन स्वर असून त्यामध्यें जेव्हां तालस्तंभ किंवा बार येतो तेव्हां बारा बाहेरील स्वरावर नुसता आकार ह्मणून ताल पडतो. त्यास विषमयति असें ह्मणतात. जसें:—

नीv प म | नीv प गv |<br>ऽ ऽ<br>जा वो औ | _ र गो |

३ **गोपुच्छयति**:—एका अक्षरावर दोहोंपेक्षां अधिक स्वर आले असतां त्यास गोपुच्छयति असें ह्मणतात. जसें:—

निv सा रें म री सा |<br>सा विर |

४ **प्लुतयतिः**—यतिमधील प्रत्येक स्वरावर खटका देऊन त्याचा आ-कार **काढ**-ण्याचा असतो तेव्हां त्यास्वरावर असणाऱ्या कौंसाकृति रेघेस प्रत्येक स्वरावर असें ऽऽ चिन्ह



असतें, त्यास प्लुतयति असें ह्मणतात. जसें:—  ग् म् प् ध् प म |
दा रे त |

५ **मृदंगयतिः**—जेव्हां यतिमधील कांहीं स्वरापासून कांहीं स्वरापर्यंतचा आकार मोठमोठा अथवा लहान लहान करण्याचा असतो तेव्हां त्या स्वरांवर असें ⊳ चिन्ह असतें

त्यास मृदंगयति ह्मणतात. जसें:—  सा
8
ना

## भाग १३ वा.

### रागविचार.

रंज् धातूपासून राग शब्द निघाला आहे. अर्थात् ज्यापासून मनाचें रंजन होईल त्यास राग ही संज्ञा आहे. हा राग शब्दाचा धात्वर्थ झाला. परंतु संगीत शास्त्रांत राग या शब्दाची व्याख्या खालीलप्रमाणें होईल.

**रागः**—सात स्वरांपैकीं अमुक स्वर शुद्ध, अमुक कोमल, अमुक तीव्र, अमुक मुख्य, अमुक ऱ्हस्व, अमुक दीर्घ, अमुक वर्ज असे आणि असेच दुसरे कांहीं ठरीव नियमांप्रमाणें गाइलेले आरोही अवरोहींतील जें स्वरांचें सम्मेलन त्यास संगीत शास्त्रांत राग ही संज्ञा आहे.

रागांच्या मुख्य पांच जाती आहेत. जसें:—( १ ) **आडव**, ( २ ) **षाडव**, ( ३ ) **संपूर्ण**, ( ४ ) **आडवसंपूर्ण** आणि ( ५ ) **षाडवसंपूर्ण.**

१ **आडवः**—ज्या रागाचे आरोही अवरोहींत नेहमीं दोन स्वर वर्ज असतात त्या रागास **आडव** असें ह्मणतात. जसें:—भूप. ह्या रागाचे आरोही अवरोहींत ऋषभ आणि पंचम वर्ज असतात.

जसें:—सा री ग प ध सां,
सां ध प ग री सा.

२ **षाडवः**—ज्या रागाचे आरोही अवरोहींत नेहमीं एक स्वर वर्ज असतो त्या रागास **षाडव** असें ह्मणतात. जसें:—कौशीकानडा. ह्या रागाचे आरोही अवरोहींत नेहमीं पंचम वर्ज असतो.

जसें:—सा री गv म ध नीv सां,

सां नीv ध म गv री सा.

३ **संपूर्णः**—ज्या रागाचे आरोही अवरोहींत कोणताही स्वर वर्ज नसतो त्यास **संपूर्ण** असें ह्मणतात. जसें:—भैरवि. या रागाचे आरोही अवरोहींत सर्व स्वर असतात. जसें:—

सा रीv गv म प धv नीv सां,

सां नीv धv प म गv रीv सा.

४ **आडवसंपूर्णः**—ज्या रागाचे आरोहींत पांच स्वर व अवरोहींत सातही स्वर असतात त्या रागास **आडवसंपूर्ण** असें ह्मणतात. जसें:—मुलतानी. ह्या रागाचे आरोहींत ऋषभ आणि धैवत वर्ज आहेत परंतु अवरोहींत सर्व स्वर येतात.

जसें:— **सा गv म⁄ प नी सां,**

**सां नी धv प म⁄ गv रीv सा**

५ **षाडव संपूर्णः**—ज्या रागाचे आरोहींत सहा स्वर व अवरोहींत सातही स्वर येतात त्या रागास **षाडव संपूर्ण** असें ह्मणतात. जसें:—खमाच. ह्या रागाचे आरोहींत ऋषभ वर्ज असतो व अवरोहींत सर्व स्वर येतात. जसें:—

सा ग म प ध नी सां,

सां नीv ध प म ग री सा.

### थाट ( मुख्य राग. )

जो राग संपूर्ण असून त्याचे आरोहींत जे स्वर कोमल अथवा तीव्र असतील तेच त्याचे अवरोहींत असतात त्यास थाट असें ह्मणतात. हे थाट बारकाईनें पाहूं गेले असतां पुष्कळ प्रकारचे होऊं शकतील, परंतु आज सर्व साधारण ऐकूं येणारे राग बारा थाटांतूनच निघालेले दिसतात ह्मणून मुख्य बारा थाट मानिले आहेत. त्यांचीं प्राचीन व अर्वाचीन नांवें व त्यांत असणाऱ्या कोमल तीव्र स्वरांचें कोष्टक खालीं दिलें आहे:—

| प्राचीन नांवें. | अर्वाचीन नांवें. | शु. | को. | शु. | को. | शु. | शु. | ती. | शु. | को. | शु. | को. | शु. | शु. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| मायामाळव गौळ | कालंगडा | सा | रीV | ० | ० | ग | म | ० | प | धV | ० | ० | नी | सां |
| हमनतोडी | भैरवी | स: | रीV | ० | गV | ० | म | ० | प | धV | ० | नीV | ० | सां |
| नटभैरवी | सिंधभैरवी | सा | ० | री | गV | ० | म | ० | प | धV | ० | नीV | ० | सां |
| शंकराभरण | देवगिरीबिलावल | सा | ० | री | ० | ग | म | ० | प | ० | ध | ० | नी | सां |
| हरिकामोदी | झिंजोटी | सा | ० | री | ० | ग | म | ० | प | ० | ध | नीV | ० | सां |
| खरहरप्रिया | काफी | सा | ० | री | गV | ० | म | ० | प | ० | ध | नीV | ० | सां |
| कीरवाणी | पिलु | सा | ० | री | गV | ० | म | ० | प | धV | ० | ० | नी | सां |
| शुभापंथवराळी | तोडी | सा | रीV | ० | गV | ० | ० | म/ | प | धV | ० | ० | नी | सां |
| सामकल्याण | रातनीपूर्या | सा | रीV | ० | ० | ग | ० | म/ | प | ० | ध | ० | नी | सां |
| मेचकल्याणी | कल्याण | सा | ० | री | ० | ग | ० | म/ | प | ० | ध | ० | नी | सां |
| कामवर्धनी | दिवसनीपूर्या | सा | रीV | ० | ० | ग | ० | म/ | प | धV | ० | ० | नी | सां |
| सूर्यकांता | रामप्रही | सा | रीV | ० | ० | ग | म | ० | प | ० | ध | ० | नी | सां |

प्राचीनकाळीं जेव्हां संगीत विद्या व संगीत कला चांगल्या स्थितींत होती तेव्हां रागसंख्या १६००० पर्यंत होती व तालसंख्या ३६० होती असें ह्मणतात; परंतु आपलीं बहुतेक शास्त्रें व कला जशा कांहीं अकाल्पित कारणामुळें लुप्त झाल्या आहेत, त्याप्रमाणेंच संगीत विद्या व कलेचा लोप होत होत प्रस्तुत ही आपली अत्युत्तम विद्या नामशेष होऊं पहात आहे. प्रस्तुत जे राग ऐकण्यांत येतात त्यांतील कोमल तीव्र स्वर, वर्जावर्ज व ते ह्मणण्याच्या वेळा वगैरेचें कोष्टक पुढील भागांत दिलें आहे.

# भाग १४ वा.

## प्रचारात असलेल्या रागांतील कोमल, तीव्र, वर्जस्वर व ते म्हणण्याच्या वेळा दाखविणारें कोष्टक.

| संख्या. | रागाचें नांव. | कोमल स्वर. | तीव्र स्वर. | वर्ज स्वर. | राग ह्मणण्याची वेळ, विशेष माहिती. |
|---|---|---|---|---|---|
| १ | अडाणा | गV नीV | ० | ० | रात्रौ बाराचे आंत |
| २ | अलैया बिलावल | नीV नी | ० | ० | सकाळपासून २ प्रहरापर्यंत |
| ३ | आनंदभैरवी | गV धV नीV | ० | ० | प्रातःकाळ |
| ४ | आसावरी | रीV गV धV नीV | ० | ० | प्रातःकाळ |
| ५ | कल्याण | ० | म/ | ० | संपूर्ण राग (थाट) रात्रौ [illegible]० वीं |
| ६ | काफी | गV नीV | ० | ० | संपूर्ण राग ( थाट ) दिवसा ३ प्रहरापासून मध्यरात्रीपर्यंत |
| ७ | कामोद | ० | म म/ | ० | रात्रौ १ ला प्रहर |
| ८ | कालंगडा | रीV धV | ० | ० | संपूर्ण राग ( थाट ) मध्यरात्रीनंतर |
| ९ | केदार | ० | म प/ | ० | रात्रीं १२ चे आंत |
| १० | केदार गौळ | नीV नी | ० | ० | सकाळपासून २ प्रहरापर्यंत |
| ११ | कौशिकानडा | गV नीV | ० | प | षाडव राग, मध्यरात्रीं |
| १२ | खमाच | नीV नी | ० | ० | रात्रीं पहिला प्रहर |
| १३ | गारा | गV ग नीV नी | ० | ० | मध्यरात्रीनंतर |
| १४ | गौड मल्हार | नीV नी | म म/ | ० | दिवसा तिसरा प्रहर |
| १५ | गौड सारंग | नीV नी | म प/ | ० | दिवसा दुसरा प्रहर |
| १६ | छाया | नीV नी | म म/ | ० | रात्रीं दुसरा प्रहर |
| १७ | जयजयवंती | गV ग नीV नी | ० | ० | मध्यरात्रीनंतर |

| संख्या | रागाचें नांव | कोमल स्वर | तीव्र स्वर | वर्ज स्वर | राग ह्मणण्याची वेळ, विशेष माहिती |
|---|---|---|---|---|---|
| १८ | जोगी आसावरी | रीV धV | ० | ० | सकाळीं पहिला प्रहर |
| १९ | जंगला | गV ग नीV | ० | ० | दिवसा ३ प्रहरापासून मध्य-रात्रीपर्यंत |
| २० | झिंझोटी | नीV | ० | ० | संपूर्ण राग ( थाट ) ( कधीं कधीं निषाद शुद्ध लावतात ) दिवसा तिसरा प्रहर |
| २१ | तोडी | रीV गV धV | म⁄ | ० | संपूर्ण राग ( थाट ) सकाळीं पहिला प्रहर |
| २२ | दरबारी कानडा | गV धV नीV | ० | ० | रात्रौ दोन प्रहरानंतर |
| २३ | दिवसनी पूरिया | रीV धV | म⁄ | ० | संपूर्ण राग ( थाट ) संध्याकाळ |
| २४ | देस | नी नीV | ० | ० | रात्रौ पहिला प्रहर |
| २५ | देसकार | ० | ० | म | षाडवराग, रात्रौ पहिला प्रहर |
| २६ | धनाश्री | गV धV नीV | ० | ० | दिवसा तिसरा प्रहर |
| २७ | नट नारायण | ० | ० | ० | संध्याकाळ |
| २८ | नाट ( तिलंग ) | गV ग नीV नी | ० | री ध | आडव, सकाळीं १० वाजतां |
| २९ | नारायणी | नीV नी | ० | ० | सकाळपासून २ प्रहरापर्यंत |
| ३० | परज | रीV धV | म म⁄ | ० | मध्यरात्रीनंतर |
| ३१ | पिलु | गV धV | ० | ० | संपूर्णराग (थाट)क्वचित् ऋषभ कोमल लावितात, दिवसा ३ प्रहर |
| ३२ | पूर्वी | रीV | म म⁄ | ० | दिवसा ३ रा प्रहर |
| ३३ | बहार | गV नीV नी | ० | ० | रात्रौ पहिला प्रहर |
| ३४ | बागेश्री ( कानडा ) | गV नीV | ० | ० | रात्रौ २ रा प्रहर |
| ३५ | बिभास | रीV धV | ० | म नी | आडवराग, पहाटेस |

| संख्या | रागाचें नांव | कोमल स्वर | तीव्र स्वर | वर्ज स्वर | राग ह्मणण्याची वेळ, विशेष माहिती |
|---|---|---|---|---|---|
| ३६ | विलावल | नीv नी | ० | ० | सकाळ पासून २ प्रहरापर्यंत |
| ३७ | बिहाग | ० | म म/ | ० | रात्रौ पहिला प्रहर |
| ३८ | भूप | ० | ० | म नी | आडवराग, पहाटेस |
| ३९ | भूपाली | ० | म/ | ० | पाहटेस |
| ४० | भैरव | रीv धv | ० | ० | सूर्योदयापूर्वी |
| ४१ | भैरवी | रीv गv धv नीv | ० | ० | संपूर्णराग ( थाट ) ह्यांत क्वचित् मध्यम तीव्र लावितात |
| ४२ | भिंपलास | गv धv नीv | ० | ० | दिवसा ३ रा प्रहर |
| ४३ | मध्यमावतीसारंग | नीv | ० | ग ध | आडवराग, दिवसा तिसरा प्रहर |
| ४४ | मालकंस | गv धv नीv | ० | री प | आडवराग, मध्यरात्री नंतर |
| ४५ | मालश्री | धv | ० | री म | आडवराग, संध्याकाळ |
| ४६ | मियाकी मल्हार | गv नीv नी | ० | ० | रात्रौ |
| ४७ | मुखारी | गv नीv | ० | ० | रात्रौ |
| ४८ | मुलतानी | रीv गv धv | म म/ | ० | दिवसा ३ रा प्रहर |
| ४९ | मंजरी | गv ग नीv | ० | ० | रात्रौ |
| ५० | मांझो | गv धv ध नीv नी | ० | ० | रात्रौ १ ला प्रहर |
| ५१ | मांड | ० | ० | ० | ह्यांत क्वचित् निषाद कोमल लावितात, रात्रौ |
| ५२ | यमनकल्याण | ० | म म/ | ० | रात्रौ १ ला प्रहर |
| ५३ | रातनीपूरीया | रीv | म/ | ० | संपूर्ण राग ( थाट ) संध्याकाळ |
| ५४ | रामग्रही | रीv | ० | ० | संपूर्ण राग ( थाट ) सकाळ |
| ५५ | ललित | रीv धv | म म/ | प | षाडव राग, रात्रौ तिसरा प्रहर |

| संख्या | रागाचें नांव | कोमल स्वर | तीव्र स्वर | वर्ज स्वर | राग ह्मणण्याची वेळ, विशेष माहिती |
|---|---|---|---|---|---|
| ५६ | वसंत | रीV धV | म म/ | प | षाडवराग, रात्रौ |
| ५७ | शहाणा | गV नीV | ० | ० | रात्रौ १ ला प्रहर |
| ५८ | शुद्धयमन | ० | म/ | ० | रात्रौ |
| ५९ | शंकरा | ० | ० | म | षाडवराग, रात्रौ |
| ६० | शंकराभरण | ० | ० | ० | संपूर्णराग ( थाट ) मध्यरात्र |
| ६१ | श्रीराग | रीV धV | म/ | ० | संध्याकाळ |
| ६२ | सारंग | नीV | ० | ग ध | ह्यांत क्वचित् निषाद शुद्ध लावितात दिवसा ३ प्रहर |
| ६३ | सुगराई | गV नीV | ० | ध | षाडवराग, संध्याकाळ |
| ६४ | सुरावली | नीV नी | ० | ० | रात्रौ |
| ६५ | सोरट | नीV नी | ० | ० | रात्रौ १ ला प्रहर |
| ६६ | सोहनी | रीV धV | म/ | प | षाडवराग, रात्रौ |
| ६७ | सिंधभैरवि | गV धV नीV | ० | ० | सकाळ |
| ६८ | सिंधुरा | गV नीV नी | ० | ० | संध्याकाळ |
| ६९ | हमीर | ० | म म/ | ० | रात्रौ १ला प्रहर |
| ७० | हिंडोल | ० | म/ | री प | आडवराग, संध्याकाळ किंवा मध्यरात्रीनंतरही ह्मणतात. |

## भाग १९ वा.

### गायनशास्त्रावर प्राचीन संगीताचार्यांचीं मतें.

आपल्या आर्य संगीताविषयीं मुख्य चार मतें आहेत तीं. १ शिवमत, २ हनुमानमत ३ कृष्णमत आणि ४ भारतमत. प्राचीनकाळीं शिव, हनुमान, कृष्ण व भरत असे चार

मोठे संगीताचार्य मानले गेले आहेत. आणि प्रत्येकजण विद्वान् असल्या कारणानें प्रत्येकानें संगीताविषयीं निरनिराळें मत स्थापन केलें आहे. रागांविषयीं कल्पना, त्यांच्या वेळा, त्यांचे पोटभेद व त्यांचे गाण्याचे धर्म प्रत्येकाच्या मतें निरनिराळे आहेत.

१ शिवमतामध्यें धृपदी गाण्याचा समावेश होतो.

२ हनुमान मतामध्यें ख्याल, टप्पा, तराणा, चतरंग, तेताल्याच्या चिजा व सरगम ह्यांचा समावेश होतो. प्रस्तुत हेंच मत सर्वत्र प्रचारांत आहेसें दिसतें.

३ कृष्णमतामध्यें बहुतेक शृंगाररस प्राधान्य आहे, त्यामध्यें ठुंबऱ्या, गज्जल वगैरेच समावेश होतो.

४ भारतमतामध्यें शांतरस प्रधान आहे. त्यांत कीर्तन, भजन वगैरेंचा समावेश होतो.

हनुमान मताप्रमाणें प्राचीनकाळीं असणारे मुख्य राग व त्यांचे असणारे पोटभेद खालील कोष्टकामध्यें दिले आहेत.

| रागाचें नांव. | प्रत्येकीं पांच रागिण्या. | | | | | प्रत्येकीं आठ पुत्र | | | | | | | | प्रत्येकीं आठ स्नुषा. | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ भैरव. | भैरवी | बेरारी | मधुमाधवी | सिंधवी | बंगाली | हर्ष | तिलक | दिवसमी परीया | माधव | सोढ | बलनेह | मधु | पंचम | सुहा | बिलावली | सोरटी | खंभारी | अनदाहरी | भलगुजरी | पटमंजरी | मीरवी |
| २ मालकंस. | तोडी | गौरी | गुनकली | खंभावती | कुकुभ | माल | मेवाड | बडहंस | प्रबल | चंद्रक | नंद | भवरा | खोखर | धन्याश्री | मालश्री | जैतश्री | सुघराई | दुर्गा | गंधारी | भिमपलासी | कामोदी |
| ३ हिंडोल. | रामकली | देशाख | ललित | बिलावल | पटमंजरी | चंद्रबिंब | मंगल | शोभा | आनंद | विनोद | प्रधान | गौर | बिभास | लीलावती | कीरवी | जती | परवी | परावती | त्रिवेणी | देवगिरी | सरस्वती |
| ४ दीपक. | देशी. | कामोद | नट | केदारा | कान्हरा | कुंतल | कमल | कलिंग | चंपक | कुसुम | राम | लहेक | हिमाल | मंगलगुजरी | जैजैवंती | मालगुजरी | भपाली | मनोहरी | अहीरी | यमन | हमीर |
| ५ श्री. | मालश्री | आसावरी | धन्याश्री | वसंत | मारवा | सिंधु | मालव | गौड | गसागर | कुंभ | गंभीर | शंकर | बिहागडा | विजया | दयावती | कुंभा | सोहिनी | सवी | क्षमा | शशिरेखा | सदासती |
| ६ मेघ. | टेंक | मल्हार | गुजरी | भुपाली | देसकार | जालंधर | सारंग | नटनारायण | शंकराभरण | कल्याण | गजधर | गंधार | शहाणा | कन्हडनाट | गावदी | कदमनाट | बहारी | मांझ | परज | नटमंजरी | शुद्धनाट |

## भाग १६ वा.

### स्वरप्रस्तार.*

स्वरप्रस्तार ह्मणजे षड्जापासून निषादपर्यंत प्रत्येक वेळीं अनुक्रमें सा, सारी, सारीग सारीगम, सारीगमप, सारीगमपध आणि सारीगमपधनी असे स्वरांचे समुदाय घेऊन त्यांचे बीजगणितांतील परिवृत्तिचे ( Law of permutations ) नियमाप्रमाणें लिहिलेले स्वर होत.

आपण कोणतीही विद्या शिकण्यापूर्वी जशीं प्रथम त्या विद्येचीं मूलतत्वें शिकतों तसेंच गायनास आधारस्तंभ जे सात स्वर त्यांचें पूर्णज्ञान करून घेणें हें अत्यंत इष्ट आहे. ह्यांचे ज्ञानानें आपणास गायनवादनविद्या थोड्याशा श्रमांत साध्य होऊं शकते. येथें थोडक्यांत पांच स्वरांपर्यंत प्रस्तार दिला आहे. तो एखादे वाद्याचे साहाय्यानें वाचण्याचा ( प्रत्येक ओळींत असणारे स्वर त्यांच्या योग्य जागा पाहून ह्मणण्याचा ) प्रयत्न केला असतां अभ्यासानें स्वरज्ञान होऊं शकेल.

| | |
|---|---|
| १ स्वराचा प्रस्तार—१ | ४ स्वरांचा प्रस्तार—२४ |
| २ स्वरांचा ,, —२ | ५ स्वरांचा प्रस्तार—१२० |
| ३ स्वरांचा ,, —६ | ६ स्वरांचा प्रस्तार—७२० |
| | ७ स्वरांचा प्रस्तार—५०४० |

सा

२ स्वरांचा प्रस्तार ( सा री )

सारी—रीसा

३ स्वरांचा प्रस्तार ( सा री ग )

सारीग—सागरी—रीसाग—रीगसा—गसारी—गरीसा.

४ स्वरांचा प्रस्तार ( सारीगम )

| | | | |
|---|---|---|---|
| सा री ग म | री सा ग म | ग सा री म | म ग री सा |
| सा ग री म | री सा म ग | ग सा म री | म ग सा री |
| सा म री ग | री ग सा म | ग री सा म | म री सा ग |
| सा री म ग | री ग म सा | ग री म सा | म री ग सा |
| सा ग म री | री म ग सा | ग म सा री | म सा ग री |
| सा म ग री | री म सा ग | ग म री सा | म सा री ग |

* **विशेष सूचनाः**—सात स्वरांपर्यंत प्रत्येक वेळीं निरनिराळे स्वर प्रारंभीं ठेऊन पूर्ण प्रस्तार व तो निरनिराळ्या रीतीनें वाचण्यासंबंधीं पूर्ण माहितीबद्दल माझें " **स्वरप्रस्तार** " या नांवाचें पुस्तक पहावें.

## ५ स्वरांचा प्रस्तार ( सा री ग म प ).

| सा री ग म प | सा ग री म प | सा म ग री प | सा प ग री म |
|---|---|---|---|
| सा री ग प म | सा ग री प म | सा म ग प री | सा प ग म री |
| सा री म प ग | सा ग प म री | सा म प ग री | सा प री ग म |
| सा री म ग प | सा ग प री म | सा म प री ग | सा प री म ग |
| सा री प म ग | सा ग म री प | सा म री प ग | सा प म री ग |
| सा री प ग म | सा ग म प री | सा म री ग प | सा प म ग री |
| | | | |
| री सा ग म प | री ग सा म प | री म ग सा प | री प ग सा म |
| री सा ग प म | री ग सा प म | री म ग प सा | री प ग म सा |
| री सा म प ग | री ग प म सा | री म प ग सा | री प सा ग म |
| री सा म ग प | री ग प सा म | री म प सा ग | री प सा म ग |
| री सा प म ग | री ग म सा प | री म सा प ग | री प म सा ग |
| री सा प ग म | री ग म प सा | री म सा ग प | री प म ग सा |
| | | | |
| ग री सा म प | ग सा री म प | ग म सा री प | ग प सा री म |
| ग री सा प म | ग सा री प म | ग म सा प री | ग प सा म री |
| ग री म प सा | ग सा प म री | ग म प सा री | ग प री सा म |
| ग री म सा प | ग सा प री म | ग म प री सा | ग प री म सा |
| ग री प म सा | ग सा म री प | ग म री प सा | ग प म री सा |
| ग री प सा म | ग सा म प री | ग म री सा प | ग प म सा री |
| | | | |
| म री ग सा प | म ग री सा प | म सा ग री प | म प ग री सा |
| म री न प सा | म ग री प सा | म सा ग प री | म प ग सा री |
| म री सा प ग | म ग प सा री | म सा प ग री | म प री ग सा |
| म री सा ग प | म ग प री सा | म सा प री ग | म प री सा ग |
| म री प सा ग | म ग सा री प | म सा री प ग | म प सा री ग |
| म री प ग सा | म ग सा प री | म सा री ग प | म प सा ग री |
| | | | |
| प री ग म सा | प ग री म सा | प म ग री सा | प सा ग री म |
| प री ग सा म | प ग री सा म | प म ग सा री | प सा ग म री |
| प री म सा ग | प ग सा म री | प म सा ग री | प सा री ग म |
| प री म ग सा | प ग सा री म | प म सा री ग | प सा री म ग |
| प री सा म ग | प ग म री सा | प म री सा ग | प सा म री ग |
| प री सा ग म | प ग म सा री | प म री ग सा | प सा म ग री |

